संकेताक सांकेतांक
क्र. २०१११२०८०८०६३५००१

वित्त विभागाच्या नावे चिन्हांकित केलेले सर्व टपाल/नस्त्या नोंदणी शाखेत स्विकारणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग, मंत्रालय**
कार्यालयीन आदेश क्रमांक :- विविआ-२०११/प्र.क्र.४४२/प्रशा-२
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मुंबई-४०००३२
दिनांक :- २९ नोव्हेंबर २०११

**कार्यालयीन आदेश**

प्रशासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, इतर विभागांकडून वित्त विभागास चिन्हांकित केलेल्या नस्त्या/टपाल स्वीकारण्याचे नोंदणी शाखेकडून कधीकधी अकारण टाळण्यात येते. नोंदणी शाखेची ही कृती गैरशिस्तीची आहे. म्हणून नोंदणी शाखेकडून या संदर्भात खालीलप्रमाणे कार्यपध्दती अनुसरण्यात यावी.

| अ.क्र. | अनुसरावयाची कार्यपध्दती |
|---|---|
| १ | वित्त विभागाच्या नोंदणी शाखेने विभागाच्या नावाने प्राप्त होणारे सर्व टपाल/नस्त्या सकाळी ९.४५ ते ५.३० या वेळेत स्विकाराव्यात. आवक लिपिकाच्या अर्धातास जेवणाच्या सुट्टीमध्ये देखिल टपाल स्विकारण्याची व्यवस्था नोंदणी शाखा प्रमुखाने करावी. |
| २ | सायंकाळी ५.३० वाजेपर्यंत स्विकारण्यात आलेल्या व तातडीच्या नस्त्या त्याचदिवशी तात्काळ संबंधित कार्यासनाकडे पाठविण्यात याव्यात, मात्र उशिराने प्राप्त झालेल्या परंतू तातडी नसलेल्या नस्त्या कोणत्याही परिस्थितीत दुस-या दिवशी सकाळी १०.३० पर्यंत संबंधित कार्यासनाकडे पाठविण्याची दक्षता घेण्यात यावी. |
| ३ | इतर विभागांकडून वित्त विभागामध्ये प्राप्त होणा-या नस्त्या हया प्रामुख्याने व्यय शाखा /अर्थसंकल्प शाखा/सेवा शाखा यांच्याशी संबंधित असतात. अशा नस्त्यांची गुणवत्ता नोंदणीशाखेने स्वत: न तपासता त्या नोंदणी शाखेत स्विकारुन संबधित कार्यासनाकडे तात्काळ पाठवाव्यात. |
| ४ | विधिमंडळ अधिवेशन कालावधीत टपाल/नस्त्या सायंकाळी ६.१५ पर्यंत नोंदणी शाखेत स्विकारण्यात याव्यात. यासाठी आवश्यक ती व्यवस्था नोंदणी शाखा प्रमुखाने करावी. |

वरील कार्यपध्दती अनुसरण्यात येत असल्याची खात्री नोंदणी शाखा प्रमुखाने करावी.

( पु.रा.हरचांदे)
अवर सचिव

प्रति,
प्रभारी नोंदणी शाखा , वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई ( नोंदणी शाखेतील सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणण्यासाठी)
**प्रत माहितीसाठी सादर,**
प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
प्रधान सचिव ( वित्तीय सुधारणा) ,वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
सचिव (व्यय), वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
सचिव ( लेखा व कोषागारे ), वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
सर्व सह सचिव/उप सचिव,वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी,वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग,
निवड नस्ती/प्रशा-२